सामाजिक न्याय विभागाच्या क्षेत्रिय आस्थापनेवरील वाहनांचा आढावा.

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक :सकआ-२०१०/प्र.क्र. ५० /आस्था-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ मे, २०१०.

**प्रस्तावना :-** सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या माध्यमातुन मागासवर्गीयांच्या कल्याणासाठी अनेकविध योजना राबविण्यात येत आहेत. या योजनांची परिणामकारक व प्रभावीपणे अंमलबजावणी व्हावी याकरीता या योजनेचे प्रत्यक्ष लाभार्थी उदा. अनुदानित वसतीगृहे, आश्रमशाळा इत्यादी संस्था तसेच वैयक्तीक लाभार्थी यांना प्रत्यक्ष भेटी देणे आवश्यक असते. त्यासाठी या योजना राबविण्याची व त्यावर नियंत्रण ठेवण्याची कर्तव्ये व जबाबदाऱ्या ज्या पदांकडे सोपविण्यात आल्या आहेत अशा पदांकरीता वाहन सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. तेव्हा या अनुषंगाने या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील पुढील कार्यालयांच्या आस्थापनेवरील वाहनांचा आढावा घेण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

१. संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
२. आयुक्त, अपंग कल्याण, पुणे.
३. संचालक, वि.जा.भ.ज., इ.मा.व. व वि.मा.प्र. कल्याण, पुणे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त अनुषंगाने या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील सर्व पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या यांचा विचार करुन कोणत्या पदास वाहन सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे याबाबत निर्णय घेऊन पुढीलप्रमाणे वाहन आढावा मंजूर करण्यात येत आहे.

| **१) संचालक, समाज कल्याण, पुणे** | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | | **वाहन अनुज्ञेय आहे असे पदनाम (वाहन संख्या)** | **आढाव्यानुसार अनुज्ञेय वाहन संख्या** |
| १ | मुख्यालय स्तर | संचालक (१),<br>अतिरिक्त संचालक (१),<br>सह संचालक (२),<br>उपसंचालक (प्रशा) (१),<br>उपसंचालक (नियोजन) (१), | ६ (सहा) |
| २ | विभागीय स्तर | विभागीय समाज कल्याण अधिकारी - मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, लातूर, अमरावती व नागपुर (प्रत्येकी एक) | ७ (सात) |
| ३ | मुबई विभाग | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी - मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग (प्रत्येकी एक) | ६ (सहा) |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | पुणे विभाग | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी - पुणे, सातारा, सांगली, सोलापुर व कोल्हापुर (प्रत्येकी एक) | ५ (पाच) |
| ५ | नाशिक विभाग | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी - नाशिक, अहमदनगर, जळगांव, धुळे व नंदुरबार (प्रत्येकी एक) | ५ (पाच) |
| ६ | औरंगाबाद विभाग | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी - औरंगाबाद, जालना, बीड व परभणी (प्रत्येकी एक) | ४ (चार) |
| ७ | लातूर विभाग | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी - लातूर, उस्मानाबाद, नांदेड व हिंगोली (प्रत्येकी एक) | ४ (चार) |
| ८ | अमरावती विभाग | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी - अमरावती, बुलडाणा, अकोला, वाशिंम व यवतमाळ (प्रत्येकी एक) | ५ (पाच) |
| ९ | नागपूर विभाग | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी - नागपुर, वर्धा, भंडारा, गोंदीया, चंद्रपुर व गडचिरोली (प्रत्येकी एक) | ६ (सहा) |
| | **एकूण (अ)** | | **४८ (अठ्ठेचाळीस)** |
| **२) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे** | | | |
| १ | मुख्यालय स्तर | आयुक्त (१), उपायुक्त (१) | २ (दोन) |
| | **एकूण (ब)** | | **२ (दोन)** |
| **३) संचालक, विजाभज व इमाव कल्याण, पुणे** | | | |
| १ | मुख्यालय स्तर | संचालक (१), सहसंचालक (१) | २ (दोन) |
| | **एकूण (ब)** | | **२ (दोन)** |
| | **एकूण (अ+ब+क)** | | **५२ (बावन्न)** |

२. नमुद करण्यात येते की, उपरोक्त वाहन आढाव्यानुसार, ज्या पदांकरीता वाहन मंजूर करण्यात आलेले आहे अशा पदांकरीता, अनुज्ञेय मर्यादेतच, आवश्यकतेनुसार राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने वाहने खरेदी करता येतील. तथापि, ज्या पदांकरीता वाहन चालकांची पदे कार्यरत आहेत अशा पदांकरीता त्यांच्याकडील निर्लेखित वाहनांऐवजी प्रथम टप्प्यात वाहने खरेदी करण्यात यावीत. तद्नंतर आढाव्यानुसार अनुज्ञेय असलेल्या इतर वाहनांच्या खरेदीची कार्यवाही करावी.

३. उपरोक्त आढाव्यानुसार ज्या पदांकरीता वाहन मंजूर करण्यात आलेले नाही अशा पदांकरीता पुर्वी वाहन मंजूर करण्यात आले असल्यास ते वाहन अतिरिक्त ठरविण्यात यावे व ते वाहन इतर अनुज्ञेय पदांकरीता वाटप करण्यात यावे.

४. उपरोक्त कार्यालयांच्या आस्थापनेवर वाहन चालकांची अतिरिक्त पदे असल्याने वरील आढाव्यानुसार मंजूर करण्यात आलेल्या वाहनांकरीता वाहन चालकाचे कोणतेही पद नव्याने निर्माण करण्यात येवु नये. या आढाव्यानुसार अतिरिक्त ठरणारी वाहन चालकांची पदे नष्ट करण्यात यावीत. तसेच अशाप्रकारे नष्ट होणाऱ्या पदांवरील अतिरिक्त ठरणाऱ्या वाहनचालकांचे व्यवस्थापन शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. वाहन-१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि. १० सप्टेंबर २००१ नुसार करण्यात यावे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१०९/२०१० दि. २५/०२/२०१० अन्वये दिलेल्या सहमतीने तसेच वाहन आढावा समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०१० ०५२५१७ ३६०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(कि.पां.वडते)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती
सचिव (प्र.सु.), सा.प्र.वि. तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती
परिवहन आयुक्त, सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (का.विनियम), मंत्रालय, मुंबई.
मा. सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक
सर्व उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती-आस्था-२